**डॉ. श्री. राहुल बी. गेठे, वैद्यकीय अधिकारी गट-अ, यांचे नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर 'उप आयुक्त' पदावर शासनाकडील प्रतिनियुक्तीच्या कोट्यातील ५ उपलब्ध पदांपैकी एका पदावर समावेशन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः- नमुंम-१२२१/ प्र. क्र. १२४/नवि-२८**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २८ ऑगस्ट, २०२३

**<u>संदर्भ:-</u>** १) डॉ. राहुल गेठे, वैद्यकीय अधिकारी गट-अ, उपजिल्हा रूग्णालय, शहापूर यांचे दि.०७.१०.२०२१ चे पत्र.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. १२१५/३९४/प्र.क्र.१६/१५/नवि-२८, दि.२१.०८.२०१७.
३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. १२२२/प्र.क्र.१२४/नवि-२८, दि.१५.१२.२०२२.
४) आयुक्त ,नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/प्रशासन/आस्था-४/ प्र.क्र.२४०/४०८२/२०२१, दि.१८.११.२०२१.
५) आयुक्त ,नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/प्रशासन/आस्था-४/ प्र.क्र.२४०/१०५२/२०२३, दि.२४.०३.२०२३.
६) आयुक्त ,नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/प्रशासन/आस्था-४/ प्र.क्र.२४०/१२२८/२०२३, दि.१३.०४.२०२३.
७) आयुक्त ,नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/प्रशासन/आस्था-४/ प्र.क्र.२४०/१३३७/२०२३, दि.२१.०४.२०२३.
८) आयुक्त ,नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/सा.प्र./आस्था-४/ १४९७/२०२३, दि.१०.०५.२०२३.
९) नवी मुंबई महानगरपालिका प्रशासक ठराव क्र. ४४५७, दि.०२.०५.२०२३.

**<u>प्रस्तावना</u>-**

डॉ. श्री. राहुल बी. गेठे, वैद्यकीय अधिकारी गट-अ, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे "उप आयुक्त" नवी मुंबई महानगरपालिका या पदावर कायम समावेशन करण्याच्या प्रस्तावास नवी मुंबई महानगरपालिका प्रशासकीय ठराव क्र. ४४५७, दि.०२.०५.२०२३ अन्वये मान्यता दिली आहे. त्यानुसार त्यांचे "उप आयुक्त" नवी मुंबई महानगरपालिका या पदावर कायम समावेशन करण्याचा प्रस्ताव आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी शासनास सादर केला होता. आयुक्तांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "उप आयुक्त" संवर्गाची एकूण ११ पदे मंजूर असून, यापैकी ५ पदांवर शासनाकडील अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येते. सदर ५ प्रतिनियुक्तीच्या कोट्यातील, उपलब्ध पदांपैकी एक पद, डॉ. राहुल गेठे, हे सदर पदावर कार्यरत असेपर्यंतच समावेशनासाठी उपलब्ध करण्यास व तद्नंतर सदर पद प्रतिनियुक्तीच्या कोट्यामध्ये वर्ग करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

डॉ. श्री. राहुल बी. गेठे, वैद्यकीय अधिकारी गट-अ, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या "उप आयुक्त" नवी मुंबई महानगरपालिका या पदावरील कायम समावेशनास नवी मुंबई महानगरपालिका आणि त्यांच्या मूळ विभागाने म्हणजेच सार्वजनिक आरोग्य विभागाने मान्यता दिली असल्याने, नवी मुंबई महानगरपालिका आस्थापनेवर उप आयुक्त संवर्गातील प्रतिनियुक्तीच्या कोट्यातील, उपलब्ध पदांपैकी एका पदावर, डॉ. राहुल गेठे, यांच्या कायम समावेशनास पुढील अटी-शर्तीनुसार शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) डॉ. श्री. गेठे हे सदर पदावर कार्यरत असेपर्यंतच शासनाकडील प्रतिनियुक्तीच्या कोट्यातील एक पद समावेशनासाठी उपलब्ध असेल. तद्नंतर सदर पद प्रतिनियुक्तीच्या कोट्यामध्ये वर्ग करण्यात येईल.

२) अशी नियुक्ती झाल्यानंतर, त्या पदधारकाची ज्येष्ठता नियुक्तीच्या दिनांकास त्या पदाच्या संवर्गात सर्वात कनिष्ठ (Zero Seniority) राहील.

३) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवणी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने ) नियम १९८१ च्या नियम ४० व परिशिष्ट दोन (शासकीय कर्मचाऱ्यांची स्वीयेत्तर बदली करण्यासंबंधातील प्रमाण अटी व शर्ती) मधील क्र. १९ येथील तरतूदीनुसार डॉ. श्री. गेठे यांचे कायमचे समावेश झाल्याच्या दिनांकापासून ते शासकीय सेवेतून निवृत्त झाल्याचे मानले जाईल.

४) डॉ. श्री. गेठे यांच्या कायम समावेशनानंतर त्यांना देय असलेली शासकीय रक्कम, निवृत्ती वेतन विषयक लाभ तसेच, त्यांच्याकडून येणे असलेल्या शासकीय रक्कमांची वसूली इ. बाबत सर्व कार्यवाही त्यांच्या मूळ विभागाकडून करण्यात यावी.

५) समावेशनानंतर निवृत्ती कालावधीपर्यंतच्या सेवाविषयक सर्व बाबींवर नवी मुंबई महानगरपालिका यांच्याकडून नियमोचित कार्यवाही करण्यात यावी.

२. आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी डॉ. श्री. गेठे यांना नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापेनवरील "उप आयुक्त" या पदावर तात्काळ रूजू करून घ्यावे. तसेच, याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०८२८११०३००१९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c2847 8562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE149 2593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2023.08.28 11:04:58 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

डॉ. श्री. राहुल गेठे, वैद्यकीय अधिकारी गट-अ, उपजिल्हा रूग्णालय शहापूर, जि. ठाणे.

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, जी.टी. हॉस्पीटल समूह इमारत, सी. एस.टी. मुंबई.
३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती ( नवि-२८ ).